

PRATHAM BOOKS
A Book in Every Child's Hand

# नाचणारे मोर आणि भजी

**Authors:** Mala Kumar, Manisha Chaudhry
**Illustrator:** Priya Kuriyan
**Translator:** Sandhya Taksale

वाचन पातळी २



आभाळ काळ्याकुट्ट ढगांनी भरून गेलंय. धडाड... धूम, ढगांचा गडगडाटही जोरदार ऐकू येतोय. पावसाळा आता अगदी तोंडावर आलाय. पावसाळा म्हणजे वर्षा ऋतू. पहिल्या पावसानंतर येणारा ओल्या मातीचा वास मला खूप आवडतो. उन्हानं भाजून निघालेल्या जमिनीलाही पहिला पाऊस खूप छान वाटत असेल.



पावसाच्या धारा जमिनीवर छान नक्षी तयार करतात. पावसाचं पाणी वाचवण्यासाठी आमच्या काकानं बाहेर पिंपं ठेवलीत. गच्चीवरचं पाणी या पिंपात पडतं. या धारांना मी म्हणते धबधबे!

पाऊस पडायला लागला की काकूला मोठ्यानं गाणं म्हणायला आवडतं.



वाराणसीला राहणाऱ्या शुभा मावशीनं मला काही सुंदर गाणी शिकवली होती. त्यांना म्हणतात - कजरी! असं म्हणतात की, अकबर राजाच्या दरबारातला मिया तानसेन मल्हार राग गायला  लागला की पाऊस पडत असे. मलाही भारतीय शास्त्रीय संगीत शिकायचं आहे.



आज शाळा सुटल्यावर पळत घरी येताना मी पावसात भिजले, पण मजा आली. आमच्या घराजवळच्या शेतात मोर नाचताना मला दिसले. ते ओले कसे होत नाहीत? त्या मोठ्या झाडावर मनूनं झोपाळा बांधलाय. त्यावर बसून, पावसाळी गार वारा अंगावर घेत ऊंच झोका घ्यायला मी इतकी अधीर झाले आहे की विचारू नका.



स्वयंपाकघरातून भजी तळल्याचा खमंग वास येतोय. अधाशीपणा होईल खरा, पण मक्याचं कणीसही खावं का?
आई आम्हाला गरम गरम दूध प्यायला लावते. काल तिनं लाह्यांचा खमंग चिवडा केला होता आणि उद्या ती पुऱ्या करणार आहे.



लवकरच सगळी झाडं, परिसर हिरवागार आणि आनंदी दिसायला लागेल. जयपूरच्या हरिभाईंनी मला नुकतीच जी हिरवी ओढणी पाठवली आहे नं अगदी त्याच रंगाचा. ते म्हणाले, की या ओढणीला तिकडे धानी चुनरिया म्हणतात. धानी म्हणजे भाताच्या कोवळ्या रोपांचा तजेलदार हिरवा रंग.

आजोबा म्हणतात, “चांगला पाऊस पडला म्हणजे चांगलं पीक येणार. आपण सगळेच पावसाची वाट बघतो आणि शेतकरी तर पावसाला देवच मानतो.”



मी एक आंब्याचं रोप लावलं होतं, आठवतंय ना? ते पावसामुळे आता चांगलंच तरारलंय. आता त्याला पाणीच घालावं लागत नाही. गेल्या महिन्यात जेव्हा मोठा वारा सुटला होता, त्यावेळी ते अगदी ताठ उभं होतं. माझं ते आंब्याचं झाड या झाडाइतकं मोठं कधी होणार?

## Story Attribution:

This story: नाचणारे मोर आणि भजी is translated by Sandhya Taksale . The © for this translation lies with Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'Peacocks and Pakodas!', by Mala Kumar, Manisha Chaudhry . © Pratham Books , 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books. Pratham Books is a not-for-profit organization that publishes books in multiple Indian languages to promote reading among children. www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: Girl and peacock in the rain, by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Girl enjoying the rain, by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Girl looking at rain water collecting in drums and man standing with umbrella, by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Girl and lady playing musical instrument, by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Girl looking at peacocks dance in the rain, by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Girl and boy sniffing aroma from kitchen, by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Girl in the field , by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Girl hugging tree in the rain, by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

# नाचणारे मोर आणि भजी
(Marathi)

ऋतुचक्र म्हणजे एका पाठोपाठ एक येणाऱ्या ऋतूंची मालिका. भारताच्या विविध प्रांतात निरनिराळ्या पद्धतीनं प्रत्येक ऋतूचं आगमन साजरं केलं जातं. निसर्गाची मोहक रुपं, रंगांची उधळण, उत्सवी वातावरण, विविध चालीरिती यांची मजा लुटू ऋतुचक्र या मालिकेत.

या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे. ओळखीचे शब्द जाणून वाचणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

